**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीची विल्हेवाट) विनियम, १९८२ च्या विनियम, १६ अंतर्गत वितरीत केलेल्या / करण्यात येणाऱ्या भूखंडावर तयार होणाऱ्या सदनिकांपैकी शासनाच्या वाट्याच्या १०% कोट्यातील सदनिकांच्या वितरणाबाबतचे धोरण .**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६५/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २९ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-** गृहनिर्माण विभाग व विशेष सहाय्य विभाग, शासन पत्र क्रमांक शिबिर-१०९६/(४२), दिनांक १८/१२/१९९६.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीची विल्हेवाट) विनियम, १९८२ च्या विनियम, १६ अंतर्गत शासनाच्या मान्यतेने म्हाडामार्फत विविध सहकारी गृहनिर्माण संस्थांना निवासी प्रयोजनाकरीता भूखंड वितरीत करण्यात आलेले आहेत. विनियम १६ खाली ज्या ज्या वेळी नियोजित सहकारी गृहनिर्माण संस्थांना म्हाडाच्या जमिनी वितरीत केल्या जातील, त्या त्या वेळी वाटप केलेल्या भूखंडावर तयार होणाऱ्या सदनिकांपैकी १०% सदनिका शासन नामनिर्देशित शासकीय अधिकारी / कर्मचारी यांच्यासाठी आरक्षित राहतील व अशा व्यक्तींची निवड शासनाच्या स्तरावर घेण्यात येईल, अशा सूचना वाचा येथील दिनांक १८.१२.१९९६ च्या शासन पत्रान्वये देण्यात आलेल्या आहेत. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या श्री. चंद्रभान सुखदेव सांगळे व इतर विरुध्द नगर विकास विभाग आणि इतर (याचिका क्र.८८२/२०११) याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक २०.०३.२०१४ रोजी पारित केलेल्या आदेशात नोंदविलेल्या निष्कर्षानुसार शासकीय मालमत्तेचे वैयक्तिकरित्या थेट कोणाला वितरण करणे योग्य होणार नाही. पारदर्शकता राहण्याच्या दृष्टीने व सर्वांना समान संधी मिळण्याच्या दृष्टीने जाहिरात प्रसिध्द करुन प्राप्त होणाऱ्या अर्जदारांमधून पात्र ठरणाऱ्यांना शासकीय मालमत्तेचे वितरण करणे आवश्यक ठरते. मा. उच्च न्यायालयाच्या उपरोक्त दिनांक २०.०३.२०१४ च्या न्यायालयीन निर्णयातील निष्कर्ष विचारात घेता, वरीलप्रमाणे शासनाच्या वाट्याच्या १०% सदनिकांचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय-

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास (जमिनीची विल्हेवाट) विनियम, १९८२ च्या विनियम १६ अंतर्गत विविध सहकारी गृहनिर्माण संस्थांना शासन मान्यतेने म्हाडामार्फत वितरीत करण्यात आलेल्या भूखंडावर तयार होणाऱ्या सदनिकांपैकी शासनास उपलब्ध करुन द्यावयाच्या १०% सदनिका यापुढे केवळ कार्यरत असलेल्या शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांना म्हाडामार्फत जाहिरात प्रसिध्द करुन सोडतीद्वारे वितरीत करण्यात याव्यात. सोडतीमधील विजयी ठरलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना या सदनिका मालकी हक्काने विक्रीने हस्तांतरीत करताना त्यांच्याकडून सदनिकांच्या बांधकाम खर्चाएवढी किंमत आकारण्यात यावी.

२. विनियम १६ अंतर्गत भूखंडाचे वाटप करण्यात आलेल्या सहकारी गृहनिर्माण संस्थांनी शासनाच्या वाट्याच्या १०% प्रमाणे उपलब्ध होणाऱ्या सदनिकांचा ताबा म्हाडाकडे सुपूर्द करावा व त्याबाबत शासनास देखील अवगत करावे. अशाप्रकारे शासनाच्या वाट्याच्या उपलब्ध होणाऱ्या १०% सदनिकांची सहकारी गृहनिर्माण संस्थानिहाय नोंदवही म्हाडाने स्वतंत्ररित्या जतन करावी.

३. विनियम १६ अंतर्गत वितरीत करावयाच्या शासनाच्या १०% कोट्यातील सदनिका शासकीय सेवेतील अधिकारी/कर्मचाऱ्यांना वितरीत करताना, म्हाडाकडून नियमितपणे ज्या सोडती प्रसिध्द केल्या जातात त्याप्रमाणे कार्यपध्दती अनुसरुन व शासकीय अधिकारी/कर्मचारी या प्रवर्गासाठी ज्या अटी व शर्ती विहित केल्या जातात त्या अटी व शर्ती लागू करण्यात याव्यात.

४. विनियम १६ अंतर्गत शासनास उपलब्ध झालेल्या १०% कोट्यातील सदनिका वितरीत करण्यासाठी प्रसिध्द करण्यात येणाऱ्या जाहिरातीमध्ये त्याबाबतचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा, जेणेकरुन म्हाडाकडून सर्वसामान्यपणे प्रसिध्द करण्यात येणाऱ्या जाहिरातींमधील शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त सदर जाहिरात असल्याचे स्पष्ट होईल.

५. विनियम १६ खाली ज्या ज्या वेळी नियोजित सहकारी गृहनिर्माण संस्थांना म्हाडाच्या जमिनी वितरीत केल्या जातील, त्या त्या वेळी वाटप केलेल्या भूखंडावर तयार होणाऱ्या सदनिकांपैकी शासनाच्या वाट्याच्या १०% सदनिकांचे वितरण सेवेत असलेल्या शासकीय अधिकारी कर्मचाऱ्यांना वरील कार्यपध्दती अनुसरुन करण्यात यावे.

६. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०८३०१०५९२५२५०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND TULSHIRAM SHETE

Digitally signed by ARVIND TULSHIRAM SHETE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=d33ed79e4d2d2921d0ca79b9de78fffaa75e5ff9801ced3d15f5ca38bf6aab62, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=822DCC756FFE36BFE50F258EB6574FFEF985EA24E97243442A9C1B3323AACA40, cn=ARVIND TULSHIRAM SHETE
Date: 2024.08.30 11:15:48 +05'30'

**(अरविंद शेटे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. सभापती, विधान परिषद/ मा. अध्यक्ष, विधानसभा
४. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा
५. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव
६. सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
७. मुख्य सचिवांचे सह सचिव
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
११. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१२. सर्व महानगरपालिका आयुक्त,
१३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई
१४. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई / पुणे-चिंचवड क्षेत्र / नागपूर/ठाणे.
१६. विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्वकास प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई ५१
१७. जिल्हाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर जिल्हा
१८. अपर जिल्हाधिकारी (अति./निष्का.) मुंबई शहर / पश्चिम उपनगरे / पूर्व उपनगरे
१९. मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई ५१
२०. गृहनिर्माण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
२१. निवड नस्ती (गृनिप)